**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी अनुदान ( केंद्र व राज्य हिस्सा ) वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०१७/प्र.क्र.६७/का-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख : २९ मार्च,२०२५

**संदर्भ :-**

१. प्र.संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा. क्रमांक : ०७/ सीटीएस/ क्षमतावाढ/ २०१७ / ३४३, दिंनाक. ०७/०७/२०१७.
२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्रमांक : MsDP-१३/६१/२०१९-MsDP-MOMA, दि २६/०९/२०१९.
३. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक : अ.वि.वि-२०१७/प्र.क्र.६७/का-७, दि. १४ ऑक्टोंबर, २०२०.
४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग,क्रमांक : अ.वि.वि-२०१७/प्र.क्र.६७/का-७, दि. १४ ऑक्टोंबर, २०२०.
५. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, बुलडाणा यांचे पत्र क्रमांक : कावि/अका/अल्पसंख्याक कक्ष/९६/२०२१, दि. २५ ऑक्टोंबर, २०२१.
६. मा. मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीचे इतिवृत्त, दि. २९ जुलै, २०२२.
७. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक : अ.वि.वि-२०१७/प्र.क्र.६७/का-७, दि. १५ सप्टेंबर, २०२२
८. जिल्हाधिकरी, बुलडाणा यांचे पत्र क्र. कावि/अका/अल्पसंख्याक कक्ष/६०३/२०२४, दि. २७.१२.२०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत-PMJVK गठित शक्तिप्रदान समिती व मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून अल्पसंख्याक विकास विभागाद्वारे संदर्भ क्र. ०७ येथील दि. १५ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये बुलडाणा जिल्हयातील शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकामाच्या रू. ११९.३० लक्ष इतक्या रकमेची सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. संदर्भ क्र.४ अन्वये केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रु.१९.५०/- लाख तसेच राज्य हिश्यातील रु.१३.००/- लाख असा एकूण रु.३२.५०/- लाख इतका निधी पहिल्या टप्प्यात जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना विहित अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यात आला आहे. सदर प्रस्तावास केंद्रः राज्य हिस्सा हा ६०:४० आहे.

२. सन २०२२-२३ पासून केंद्र शासनाकडून प्रकल्पनिहाय निधी वितरीत करण्यात येत नाही.केंद्र शासनाकडून एखाद्या प्रकल्पाकरीता अगोदरच वितरीत करण्यात आलेला निधी राज्य शासनाकडे उपलब्ध असेल तर उपलब्ध असलेला निधी गरजेनुसार दुसरा प्रकल्प पूर्ण करण्याकरीता वापरून, प्रकल्प विहित वेळेत पूर्ण करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

३. सदर मार्गदर्शक सूचना विचारात घेता, प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील दुसऱ्या टप्यातील रु. १९.५०/- लाख तसेच राज्य हिश्श्यातील दुसऱ्या टप्प्यातील रू.१३.००/- लाख असा एकूण (केंद्र + राज्य ) रू. ३२.५०/- लाख इतका निधी योजनेच्या Single Nodal Account मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून PFMS प्रणालीव्दारे जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना मंजूर करून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील दुसऱ्या टप्यातील रू.१९.५० /- लाख तसेच राज्य हिश्श्यातील दुसऱ्या टप्प्यातील एकूण रू.१३.००/- लाख असा एकूण (केंद्र राज्य) रू. ३२.५०/- लाख इतका निधी योजनेच्या Single Nodal Account मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून PFMS प्रणालीव्दारे जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र (११) व (१२) प्रमाणे मंजूर करून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**<u>प्रकल्पाचे नाव</u>** <u>- कार्यशाळा व दोन वर्गखोल्यां बांधकाम, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शेगाव.</u>

(रू. लाखात)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प किंमत(सुधारीत प्र.मानुसार) | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | अतिरिक्त राज्य हिस्सा | वितरीत पहिल्या हप्त्यातील निधी | | वितरीत करावयाचा दुस-या हप्त्यातील निधी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
| १ | २ | ५ | ६ | ७ | ८ | | ९ | १० | ११ | १२ |
| १ | शेगाव ITI येथे कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकाम | ११९.३ | ३९ | २६ | ६५ | ५४.३ | १९.५ | १३ | १९.५ | १३ |

२. केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने

i. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single Nodal Agency म्हणून अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

ii. तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना PFMS प्रणालीवर Map करण्यात आली आहे.

३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमकरीता केंद्र शासनाकडून वितरीत केलेला व त्यासमरूप वितरीत करावयाचा राज्य हिश्श्यातील निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा, मुंबई येथे उघडण्यात आलेल्या SNA खाते क्र. ४०५३३३४५६७८ व IFSC CODE- SBIN००६१५२४ खात्यावर जमा करण्यात आला आहे. जमा करण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामधून शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाकरीता उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (११) व (१२) प्रमाणे केंद्र व राज्य हिश्यातील दुसऱ्या टप्यातील रू.३२.५०/- लाख इतका निधी PFMS प्रणालीव्दारे प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना वितरीत करण्यात यावा.

४. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादित.C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधितांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित अंमलबजावणी अधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील.

५. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR). (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३. दि. १२ एप्रिल, २०२३ व २५ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१४५४५१७६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHAKHA SACHIN ADHAV

Digitally signed by VISHAKHA SACHIN ADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b2ad90146c0c24582e5f69373fdb00dd8bff89e962d3f5d3bb153e589b39cc43, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=65EF4533476D0EA1DB9995A9B28EDC4173C3B94922081D293614536B5BEAD664, cn=VISHAKHA SACHIN ADHAV
Date: 2025.03.29 14:55:36 +05'30'

**(विशाखा आढाव)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव ,सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.
१. विभागीय आयुक्त, अमरावती.

२. जिल्हाधिकारी, बुलडाणा.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, बुलडाणा.
४. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
७. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बुलडाणा.
९. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
१०. संचालक,व्यवसाय शिक्षण (प्रशिक्षण) संचालनालय, मुंबई.
११. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, अमरावती विभाग, अमरावती.
१२. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शेगाव, जि. बुलडाणा.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलडाणा.
१४. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१५. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१६. निवड नस्ती, का.७